**मॅफको लिमिटेड, मुंबई या महामंडळाला ना परतावा म्हणून दिलेले कर्ज परतावा कर्ज म्हणून समजणेबाबत व सदरच्या कर्जाची व्याजासह रक्कम योग्यता लेखाशिर्षाखाली जमा करणे.**

# महाराष्ट्र शासन
## वित्त विभाग
## शासन निर्णय क्रमांकः शासाउ-१०.१६/प्र.क्र.१/सा.उ.

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: ११ जानेवारी, २०१७

**वाचा :-**

१) शासन निर्णय क्रमांकः कृषि व सहकार विभाग, क्र.मॅफको-१०१७/८३४२२-डी,दि.१८/१०/१९७२
२) शासन निर्णय क्रमांकः कृषि व सहकार विभाग, क्र.मॅफको-१०७४/८३४२२/डी, दि.६/२/१९७४.
३) शासन निर्णय क्रमांकः कृषि व सहकार विभाग, क्र.मॅफको-१०७८/१८७९५/९ एडीएफ (४९१), दि.२९/१/१९७९.
४) शासन निर्णय क्रमांकः कृषि व सहकार विभाग, क्र.मॅफको-१०७६/४२९२४/९अेडीएफ, (४७६), दि.२/२/१९७९.
५) शासन निर्णय क्रमांकः कृषि व पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग क्रमांक मॅफको १०८९/४४४३/के.नं.५५/९८/पदुम ३, दि.२९/१/२०००.
६) शासन निर्णय क्रमांकः वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक शासाउ-१०१२/प्र.क्र.१२/साउ, दि.१६/३/२०१२.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भाधीन क्रमांक १ येथील दिनांक १८/१०/१९७२ च्या शासन निर्णयान्वये महामंडळास हस्तांतरीत करण्यात आलेल्या मालमत्तेची भांडवली किमंत ही भाग-भांडवल - तथा-कर्ज म्हणून समजावे आणि या किंमतीपैकी ४०% भाग-भांडवल आणि ६० % कर्ज म्हणून समजावे असा निर्णय घेण्यात आला आहे. शासन निर्णय दि.२९/१/१९७९ च्या शासन निर्णयान्वये वरीलप्रमाणे ६०% परिगणित करावयाच्या कर्जावर प्रतिवर्ष ६.५% व्याजदर आकारण्यात आला आहे आणि हे कर्ज ना-परतावा कर्ज म्हणून समजण्यात यावे असा निर्णय घेण्यात आला आहे. तसेच शासन निर्णय दि.२/२/१९७९ आणि दि.२९/१/२००० अन्वये मॅफकोकडे हस्तांतरीत केलेल्या सर्व मालमत्तेचे अंतिम मुल्यांकन करण्यात आले आहे.

२. मॅफको महामंडळास हस्तांतरीत करण्यात आलेल्या मालमत्तेचे अंतिम मुल्यांकनापैकी ६०% कर्ज म्हणून परिगणित केलेली रक्कम ना-परतावा कर्ज आता महामंडळाने शासनास सन २०११-१२ या वर्षाच्या व्याजासह (६.५% व्याज दराने) परत करावे असे संदर्भाधीन क्रमांक ६ येथील दि.१६/३/२०१२ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आलेली आहे.

३. तथापि, उपरोक्त क्रमांक ६ येथील शासन निर्णयामध्ये कर्जाच्या परतफेडीची रक्कम जमा करण्याबाबत लेखाशिर्ष नमूद करण्यात आलेले नाही. तरी सदर कर्जाच्या परतफेडीची रक्कम जमा करण्यासाठी योग्य ते लेखाशिर्ष नमूद करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

संदर्भाधीन क्र.६ येथील दि.१६/३/२०१२ रोजीचा शासन निर्णयान्वये मॅफको महामंडळास हस्तांतरीत करण्यात आलेल्या मालमत्तेचे अंतिम मुल्यांकनापैकी ६०% कर्ज म्हणून परिगणित केलेली रक्कम ना-परतावा कर्ज मॅफको महामंडळाने शासनास कर्जावरील व्याजासह (६.५% व्याज दराने) खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात / परत करण्यात यावी :-

**मागणी क्रमांक -जी १०**
**७४७५, इतर सर्वसाधारण आर्थिक सेवांसाठी कर्जे**
**८००, इतर कर्जे**
**(००)(०१) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रम यांना कर्जे-मॅफको मर्यादित यास कर्जे**
**(७४७५-०१५-२) (योजनेतर)(दत्तमत)**
**५५, कर्जे व आगाऊ रकमा**

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१११२३३२७६२०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Nandkumar Vinayak Patil

Digitally signed by Nandkumar Vinayak Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ce9cafdb2d77228866b253453609d4172186ef633a0e6652be9122d2ff0f02b4, serialNumber=902abe41cad66d00f934742a06d8ef2ed271058f89b916c049998c81b874e0a2, cn=Nandkumar Vinayak Patil
Date: 2017.01.11 13:16:25 +05'30'

( नं. वि. पाटील )
अवर सचिव, वित्त विभाग

**प्रत,**

१. व्यवस्थापकीय संचालक, मॅफको लिमिटेड, मुंबई,
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), मुंबई,
३. महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), नागपूर,
४. संचालक (लेखा व कोषागारे), शासकीय कुटीर क्रमांक १५ व १६, प्लॅाट क्रमांक १७६, फ्री प्रेस जर्नल मार्ग, मुंबई-२१,
५. सहसंचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, शासकीय कुटीर क्रमांक १५ व १६, प्लॅाट क्रमांक १७६, फ्री प्रेस जर्नल मार्ग, मुंबई-२१,
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक,
८. प्रधान सचिव (वित्तीय सुधारणा) यांचे स्वीय सहायक,
९. उपसचिव (ऋण व हमी), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०.निवडनस्ती (सा.उ.)